राज्यस्तर युवा पुरस्कार निवड समितीवर
अशासकीय सदस्यांची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : युकयो २०१७/प्र.क्र.१०६/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ४ सप्टेंबर, २०१७.

वाचा:-

१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र:- युकयो २०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३ दि. १२ नोव्हेंबर, २०१३.

**प्रस्तावना: -**

महाराष्ट्र राज्याच्या युवा धोरण- २०१२ मधील शिफारशींच्या अनुषंगाने राज्यातील/जिल्ह्यांतील युवांनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवा विकासाचे कार्य करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे यासाठी दि. १२ नोव्हेंबर, २०१३ च्या शासन निर्णयानुसार प्रतिवर्षी राज्य व जिल्हा स्तरावर युवा पुरस्कार देण्यांस शासन मान्यता देण्यांत आली आहे. प्रस्तुत शासन निर्णयातील विहित तरतुदीनुसार युवा पुरस्कारार्थींची निवड करण्यासाठी स्थापन करण्यांत आलेल्या राज्य स्तरावरील निवड समितीवर दोन अशासकीय सदस्यांची निवड करण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दि. १२ नोव्हेंबर, २०१३ च्या अनुषंगाने युवा पुरस्कारार्थींची निवड करण्यासाठी स्थापन करण्यांत आलेल्या राज्यस्तर पुरस्कार निवड समितीवर अनु. क्र. ४ येथे नमूद केलेल्या राष्ट्रीय युवा पुरस्कारप्राप्त/राज्य युवा पुरस्कारप्राप्त व्यक्ती म्हणून खालील दोन अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यांस मान्यता देत आहे.

१) डॉ. मिलिंद भोई, पुणे - राष्ट्रीय युवा पुरस्कारप्राप्त
२) श्रीम. श्वेता परुळेकर, कोल्हापूर - राज्य युवा पुरस्कारप्राप्त

२. उपरोक्त सदस्यांचा कार्यकाल पुरस्कार वर्षापुरता मर्यादित राहील. उपरोक्त अशासकीय सदस्यांना राज्यस्तर पुरस्कार निवड समितीच्या बैठकींकरीता उपस्थित रहाण्यासाठी बैठकभत्ता व दैनंदिन भत्ता वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय राहील. तसेच या बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. ई-३-२२०४ क्रीडा व युवक सेवा,१०३ विद्यार्थीतर युवक कल्याण कार्यक्रम, (१०)(१०)युवा धोरण अंतर्गत युवा पुरस्कार (२२०४-५५६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (कार्यक्रमावरील खर्च) या लेखाशिर्षांतर्गत त्या त्या आर्थिक वर्षांत उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यांत यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०४१५१८०८९३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.09.04 15:07:31 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव

२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.

४) सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.

६) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.

७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)

८) वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे (संचालनालयामार्फत)

९) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, (संचालनालयामार्फत)

१०) सर्व जिल्हाधिकारी (संचालनालयामार्फत)

११) राज्य समन्वयक नेहरु युवा केंद्र (संचालनालयामार्फत)

१२) संबंधित अशासकीय सदस्य (संचालनालयामार्फत)

१३) निवडनस्ती, क्रीयुसे-३